**शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर येथे कंत्राटी आहार सेवा उपलब्ध करुन घेणेसाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय, क्रमांकः PHD-१६०२७/१/२०२५ (Arogya ३) (ई-फाईल क्र.९३२४५३)**

१० वा मजला, गो.ते. रुग्णालय प्रशासकीय इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २९ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) सहसंचालक आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे-६ यांचे पत्र जा.क्रमांक : ससंआसे/ कुष्ठवक्षय/कक्षभांडार/शशिकला/आहार/प्रमा/२७४३०-३३/२४,दिनांक ०३/१२/२०२४.

२) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे-६ यांचे पत्र जा. क्रमांक : ससंआसे/ कुष्ठवक्षय/कक्षभांडार/शशिकला/आहार/प्रमा/४०७१-७४/२५,दिनांक १७/०२/२०२५.

**प्रस्तावना :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे यांनी संदर्भीय पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार दि. ०४.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार मे. डी. एम. एंटरप्रायजेस, नवी मुंबई या संस्थेस पुढील तीन वर्षासाठी आहार सेवा पुरवठा करणेसाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. परंतु, सदर संस्थेने रुग्णालयातील प्रतिदिन सरासरी ३-४ रुग्णांना आहार सेवा देण्यासाठी विविध अडचणीसह स्वतंत्र किचन सुरु करणे आर्थिक दृष्ट्या परवडणारे नसल्याने सदर आहार सेवा सुरु करण्यास नकार दिलेला आहे. त्यामुळे शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर या रुग्णालयामध्ये आंतररुग्णांसाठी कंत्राटी पद्धतीने आहार सेवा उपलब्ध करुन घेणेसाठी विहीत शासन खरेदी पद्धतीचा अवलंब करुन दरपत्रक प्रक्रिया राबविण्यात आली. त्यामध्ये न्युनत्तम दरानुसार पात्र ठरलेल्या मे. हरी ओम खानावळ, जयसिंगपूर या पुरवठादार संस्थेकडून शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर येथे एक वर्षाकरिता कंत्राटी आहार सेवा उपलब्ध करुन घेणेसाठी येणाऱ्या वार्षिक अंदाजित रुपये ४,८६,०००/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांनी संदर्भीय पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर या रुग्णालयाकरीता मे. हरी ओम खानावळ, जयसिंगपूर या पुरवठादार संस्थेकडून प्रतिदिन प्रतिरुग्ण रुपये १३५/- प्रमाणे पुढील एक वर्षाकरिता

कंत्राटी दैनंदिन आहार सेवा (सकाळचा चहा + नाश्ता, दुपारचे जेवण, सायंकाळचा चहा, रात्रीचे जेवण) उपलब्ध करुन घेणेसाठी येणाऱ्या वार्षिक रुपये ४,८६,०००/-( अक्षरी रुपये चार लाख श्याहऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर दैनंदिन आहार सेवा ही प्रशासकीय मान्यतेच्या दिनांकापासून पुढील एक वर्षाकरीता राहील, त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| अ.क्र | पुरवठादार संस्था | खाटांची संख्या | प्रतिदिन सरासरी रुग्ण | प्रतिरुग्ण प्रतिदिन दर | अंदाजित वार्षिक खर्च | कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **मे. हरी ओम खानावळ, जयसिंगपूर** | २० | १० | १३५/- | ४,८६,०००/- | ०१ वर्षे |

२. <u>अटी व शर्ती</u> :-

(१) सदर आहारसेवा साठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस- २०१४/ प्र.क्र.८२/भाग ।।।/ उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

(२) शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर या रुग्णालयामधील आंतररुग्णांना नियमितपणे आहार उपलब्ध होईल तसेच सदर आहाराचा दर्जा योग्य राहील, याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित वैद्यकीय अधिक्षक यांची राहील.

(३) रुग्णांना पुरविण्यात येणाऱ्या आहारसेवेची व आहाराच्या दर्जाची संबंधित वैद्यकीय अधिक्षक यांनी नियमित तपासणी करणे बंधनकारक राहील.

(४) संबंधित रुग्णांना द्यावयाच्या आहार सेवेचे वेळापत्रक/फलक संबंधित रुग्णालयाच्या वार्डमध्ये प्रदर्शित करणे व त्याबाबतच्या नोंदी ठेवणे आवश्यक राहील.

(५) वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/ शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधीत अधिकाऱ्याची राहील.

३. सदरचा खर्च हा मागणी क्रमांक १ मुख्य लेखाशिर्ष -२२१० वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य, -०६ सार्वजनिक आरोग्य, -१०१, रोग प्रतिबंध व रोग नियंत्रण, -(०४) इतर रुग्णालये व दवाखाने, -(०४)(०१) क्षयरोग रुग्णालये व आरोग्य धामे, सांकेतांक क्रमांक -२२१० ०१९१, (१९)-आहार सेवा या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा, सदर वर्षाकरीता निधी शिल्लक नसल्यास, सदरचा खर्च सन २०२५-२६ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-चार मधील अ.क्र. ११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५०६०७४४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: cn=Shivdas Mahadeo Dhule, o, ou, email=shivdas.dhule@nic.in, c=US
Date: 2025.03.29 18:42:02 +05'30'

(शि. म. धुळे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे.
६. उप संचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, कोल्हापूर.
८. वैद्यकीय अधिक्षक, शशिकला क्षयरोग आरोग्यधाम जयसिंगपूर, कोल्हापूर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.कोल्हापूर.
१०. वित्त विभाग (कोषागारे/प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य-३).